**हॉटेल आस्थापनांच्या वेळा विनियमित करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन.
गृह विभाग (विशेष),
शासन परिपत्रक क्रमांक - आरईएच २०११ / १०६ / विशा ५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक- ०३डिसेंबर, २०११.

**वाचा :-**
१) शासन परिपत्रक गृह विभाग क्र. आरईएच ०१८९ / विशा - ५, गृह विभाग (विशेष), दिनांक १० मार्च, १९८९.
२) शासन परिपत्रक गृह विभाग क्र. आरईएच ०१९६ / १५० / विशा - ५, गृह विभाग (विशेष), दिनांक ९ ऑक्टोबर, १९९७.
३) शासन परिपत्रक गृह विभाग क्र. आरईएच ०१९९ / ८५ / विशा - ५, गृह विभाग (विशेष), दिनांक ५ जून, १९९९.
४) शासन परिपत्रक गृह विभाग क्र. आरईएच ०१९९ / १२४ / विशा - ५, गृह विभाग (विशेष), दिनांक ०९ सप्टेंबर, १९९९.
५) शासन परिपत्रक गृह विभाग क्र. आरईएच ०१९९ / ८५ / विशा - ५, गृह विभाग (विशेष), दिनांक २४ मे, २००१.

**परिपत्रक**

संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये राज्यात हॉटेल आस्थापनांमध्ये खाद्यपदार्थ व मद्य पुरविण्याच्या वेळांबाबत तसेच हॉटेल आस्थापना बंद करण्याच्या वेळांबाबतची मार्गदर्शक तत्वे विहीत करण्यात आली आहेत. संपूर्ण राज्यात विहीत करण्यात आलेल्या हॉटेल आस्थापनांच्या वेळांबाबत एकसुत्रता नसल्याने निर्माण होणारा संभ्रम दूर करण्याच्या दृष्टीने हॉटेल आस्थापनांच्या वेळेत एकसूत्रता आणण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने निमंत्रीत केलेल्या बैठकीत सर्व संबंधीत विभागांच्या अधिका-यांशी झालेल्या चर्चेअंती केलेल्या शिफारशीनुसार आता संपूर्ण राज्यात हॉटेल आस्थापनांच्या संदर्भात खालीलप्रमाणे वेळा निश्चित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१) मुंबई, नवी मुंबई व ठाणे आयुक्तालयाच्या परिक्षेत्रातील हॉटेल आस्थापनांमध्ये रात्रौ ०१.३० वाजेपर्यंत खाद्यपदार्थ व मद्य पुरविण्यास हरकत नसावी. मात्र सदर आस्थापना ०१.३० वाजता बंद करण्यात यावी.

२) पुणे, नागपूर, औरंगाबाद आणि नाशिक आयुक्तालयाच्या परिक्षेत्रातील आस्थापनांच्या संदर्भात रात्रौ ११.३० वाजेपर्यंत खाद्यपदार्थ व मद्य पुरविण्यास हरकत नसावी आणि हॉटेल आस्थापना रात्रौ १२.३० वाजता बंद करण्यात यावी.

३) उर्वरित महाराष्ट्राकरीता हॉटेल आस्थापनामध्ये रात्री १०.०० वाजेपर्यंत खाद्यपदार्थ व मद्य पुरविण्यास हरकत नसावी आणि आस्थापना रात्रौ ११.३० वाजता बंद करण्यात यावी.

४) शासन परिपत्रक गृहविभाग क्र. आरईएच ०१९७ / १५० / विशा -५, दिनांक ०९.१०.१९९७ अन्वये चार तारांकीत व त्यावरील तारांकीत असणा-या ज्या आस्थापनांमध्ये डिस्कोथेक क्लबना परवानगी देण्यात आली आहे अशा आस्थापनांना सदर परिपत्रकात नमूद अटीच्या अनुषंगाने रात्रौ ०३.०० वाजेपर्यंत आस्थापना उघडी ठेवण्यास परवानगी देण्यात यावी.

हे आदेश उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत असून हे आदेश तत्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**( श. बा. पावसकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
गृह विभाग (विशेष), मंत्रालय.

प्रति,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) प्रधान सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
३) प्रधान सचिव, राज्य उत्पादन शुल्क, मंत्रालय, मुंबई - ३२.
४) प्रधान सचिव, (कामगार) उदयोग उजा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२.
५) सर्व जिल्हादंडाधिकारी, महाराष्ट्र राज्य,
६) सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
७) कामगार आयुक्त, मुंबई.